मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजनांतर्गत “११- देशांतर्गत प्रवास खर्च” या उद्दीष्टाखाली उपलब्ध असणारा निधी “०३- अतिकालिक भत्ता” या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : एफडीएम-२०२४/प्र.क्र.४८/फ-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०२५.**

**वाचा :** १) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र.एफडीएम-२०२४/प्र.क्र.४८/फ-२, दि.२९.०७.२०२४.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.०१(भाग-१)/२३१/२०२४-२५, दि.१४.०८.२०२४.

३) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र.एफडीएम-२०२४/प्र.क्र.४८/फ-२, दि.१०.१०.२०२४.

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ करीता मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजना अंतर्गत “०३- अतिकालिक भत्ता” या उप लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी अपुरा पडत असल्यामुळे उपरोक्त “वाचा” क्र.१ येथील शासन आदेशान्वये, मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजनांतर्गत प्रादेशिक वनसंरक्षक (२४०६ ००४२), अग्नीपासून वनांचे संरक्षण (२४०६ ०१३१), मध्यवर्ती रोपमळे वन (२४०६ ०२५६) या ३ लेखाशिर्षाखालील “११- देशांतर्गत प्रवास खर्च” या उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेल्या निधीपैकी रु.३३.५४ लक्ष इतका निधी “०३- अतिकालिक भत्ता” या उद्दीष्टाखाली पुनर्वितरणाव्दारे उपलब्ध करून देण्यात आला होता.

तथापि, सदर निधीही अपुरा पडत असल्यामुळे अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या “वाचा” क्र.२ येथील पत्रान्वये, “११- देशांतर्गत प्रवास खर्च” या अंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीपैकी एकूण **रु.३९.२२ लक्ष** इतका निधी “०३- अतिकालिक भत्ता” या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करून मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास पुन:श्च सादर केला होता. त्या अनुषंगाने “वाचा” क्र.३ येथील शासन आदेशान्वये, मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजनांतर्गत प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६), शासकिय अभिकरणाकडून समुपयोजन (तेंदू) (२४०६ ०४५२) व शासकिय अभिकरणाकडून समुपयोजन (इमारती लाकुड) (२४०६ ४७२) या ३ लेखाशिर्षाखालील “११- देशांतर्गत प्रवास खर्च” या उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेल्या निधीपैकी रु.३१.०८ लक्ष इतका निधी “०३- अतिकालिक भत्ता” या उद्दीष्टाखाली पुनर्वितरणाव्दारे उपलब्ध करून देण्यात आला होता. तथापि, “११- देशांतर्गत प्रवास खर्च” या

उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेले अनुदान अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर या कार्यालयामार्फत समर्पित न झाल्याने उर्वरित रु.८.१४ लक्ष इतका निधी पुनर्वितरणाद्वारे उपलब्ध करुन देता आला नाही.

आता, उर्वरित रु.८.१४ लक्ष इतक्या निधीचे अनुदान अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर कार्यालयामार्फत समर्पित करण्यात आले आहे.

त्या अनुषंगाने, सदर निधी पुनर्वितरण करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

सन २०२४-२५ या वर्षाकरीता मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजनांतर्गत पुढील २ लेखाशिर्षाखालील “११- देशांतर्गत प्रवास खर्च” या उद्दीष्टाखाली उपलब्ध असणाऱ्या निधीपैकी **रु.८.१४ लक्ष** इतका निधी “०३- अतिकालिक भत्ता” या उद्दीष्टाखाली पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे पुनर्वितरण करण्यास व बीम्स् (BEAMS) प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

**(रक्कम लाखात)**

| अ. क्र. | मुख्यलेखाशिर्ष | सविस्तर शीर्ष | अर्थसंकल्पित तरतूद | उपलब्ध असलेला व वितरित निधी | खर्च झालेला निधी | शिल्लक निधी (५-६) | पुनर्वितरणा करिता प्रस्तावित निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** |
| १. | कार्य आयोजनेची सुधारणा व तयारी (२४०६ ०१४९) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | २७.३० | १६.३८ | १२.१० | ४.२८ | (- १.०६) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | २.१० | २.१० | १.७२ | ०.३८ | (+ १.०६) |
| २. | निसर्ग संवर्धन व वन्यपशू संरक्षण (२४०६ ०७६६) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ७३.०० | ४३.८० | २९.२२ | १४.५८ | (- ७.०८) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | ७.३५ | ७.३५ | ६.८५ | ०.५ | (+ ७.०८) |
| | **एकूण** | **११- देशांतर्गत प्रवास खर्च** | | | | | **(- ८.१४)** |
| | | **०३- अतिकालिक भत्ता** | | | | | **(+ ८.१४)** |

२. पुनर्वितरणाने उपलब्ध करुन दिलेला निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे. त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची खातरजमा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन आदेश, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३५३/२०२४/व्यय-१०, दि.२३.०८.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,

१९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र.३, परिच्छेद १६६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२८१७२५२९७२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2025.02.28 17:26:10 +05'30'

(भगवान सावंत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा.नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व) आणि अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).
४) मुख्य वनसंरक्षक (सर्व).
५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
७) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
९) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
११) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.